रचना सहायक पदावरील पात्र कर्मचाऱ्यांना सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-२ (गट-ब / राजपत्रित) पदावर पदनिर्देशित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वेतन-१७१७/१६१/प्र.क्र.१७/नवि-२७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १४ जुलै, २०१७.

**वाचा:-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१९९०/५६/प्र.क्र.१९०/भाग-२/नवि-२७, दि.०७ जुलै, १९९७.
२. नगर विकास विभाग, शासन अधिसूचना क्र.टिपीव्ही-२७०८/९१/सीआर १८/०७/ नवि-२७,दि.०१ ऑगस्ट, २०११.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/रचना सहायक/सनर-श्रेणी-२/दर्जा/प्रशा-१/३२१, दि.१७.०१.२०१७.

**प्रस्तावना:-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील रचना सहायक संवर्गात ०५ वर्षे सलग सेवा केलेल्या व ज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या पदविकाधारक कर्मचाऱ्यांना त्यांच्या पदनामामध्ये बदल करुन सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-२ (गट-ब / राजपत्रित) (पीबी-३ रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु.४४००) या पदनामाने पदनिर्देशित करण्याबाबत संदर्भाधिन, दि.०७ जुलै, १९९७ रोजीच्या शासन निर्णयान्वये तरतूद करण्यात आली आहे.

०२. नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील तांत्रिक संवर्गातील पदांचे सेवाप्रवेश नियम संदर्भाधिन, दि.०१ ऑगस्ट, २०११ रोजीच्या शासन अधिसूचनेन्वये विनियमित करण्यात आले आहेत. त्यानुसार संचालनालयामध्ये रचना सहायक हे पद धारण करणाऱ्या आणि नियमित तत्वावर रचना सहायक या पदावर पाच वर्ष अखंड सेवा झालेल्या व्यक्तीस आयोगाशी विचारविनियम करुन, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी दोन गट ब म्हणून पदनिर्देशित करता येईल, अशी तरतूद करण्यात आली आहे.

०३. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संचालनालयाच्या आस्थपनेवरील रचना सहायक पदावर पाच वर्षे अखंड सेवा केलेल्या, ज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या व अन्य अनुषंगिक

सेवाविषयक बाबींची पूर्तता केलेल्या नऊ कर्मचाऱ्यांना सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी दोन गट ब म्हणून पदनिर्देशित करण्याबाबत संदर्भाधिन, दि.१७.०१.२०१७ रोजीच्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत:-

## शासन निर्णय:-

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील रचना सहायक संवर्गात ०५ वर्षे सलग सेवा केलेल्या व ज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-२ (गट-ब / राजपत्रित) या पदनामाने पदनिर्देशित करण्यात येऊन पीबी-३ रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु.४४०० ही वेतनसंरचना लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | रचना सहायक यांचे नाव | शैक्षणिक अर्हता | सध्याच्या पदावरील नियुक्तीचा दिनांक | सलग ०५ वर्ष सेवा पूर्ण करित असल्याचा दिनांक | सुधारित वेतनसंरचना लागू करावयाचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | १ | श्री. सु. अ. भवते | डी.सी.ई. | १७.११.२००६ | १६.११.२०११ | १७.११.२०११ |
| २. | २ | श्री. दि. दि. तायडे | डी.सी.ई. | ०१.१२.२००६ | ३०.११.२०११ | ०१.१२.२०११ |
| ३. | ३ | श्री. ग. सु. जाधव | डी.सी.ई. | २६.१२.२००६ | २५.१२.२०११ | २६.१२.२०११ |
| ४. | ४ | श्री. हे. ह. गजभिये | डी.सी.ई. | ३०.०५.२००८ | २९.०५.२०१३ | ३०.०५.२०१३ |
| ५. | ५ | श्री. हे. य. पडेलकर | डी.सी.ई. | ३०.०५.२००८ | २९.०५.२०१३ | ३०.०५.२०१३ |
| ६. | ६ | श्री. ग. तु. शिरसाठ | डी.सी.ई. | ३०.०५.२००८ | २९.०५.२०१३ | ३०.०५.२०१३ |
| ७. | ७ | श्री. म. स. जाधव | डी.सी.ई. | ३०.०५.२००८ | २९.०५.२०१३ | ३०.०५.२०१३ |
| ८. | ८ | श्री. ना. वा. जोशी | डी.सी.ई. | २५.०२.२००९ | २४.०२.२०१४ | २५.०२.२०१४ |
| ९. | ९ | श्री. दे. म. मानतकर | डी.सी.ई. | ०१.०८.२००९ | ३१.०७.२०१४ | ०१.०८.२०१४ |

०२. सदरची मान्यता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाशी विचारविनिमय करण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

०३. या आदेशान्वये पदनिर्देशित करण्यात येत असलेले कर्मचारी हे आवश्यक सेवाविषयक अटी व शर्तींची पूर्तता करीत असल्याबाबत संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी खातरजमा करावी.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०७१४१३३३१००९२५** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.07.15 12:21:17 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित कर्मचारी, -----------------------------------------------यांना,
(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत.)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. (३-प्रती)
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर.
७. सर्व सह संचालक, नगर रचना------------------------.
८. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी--------------------,
९. मा. राज्यमंत्री, नगर विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती / नवि-२७.

*****